वक्फ अधिनियम, १९९५ च्या कलम ४(६) मधील सुधारीत तरतुदींनुसार, महाराष्ट्र राज्यातील वक्फ संस्थाचे/ मालमत्तांचे दुसरे (Second) सर्वेक्षण करणेबाबत............

# महाराष्ट्र शासन

## अल्पसंख्याक विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः अविवि २००९/प्र.क्र.१०५/कार्यासन-४,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ०७ डिसेंबर, २०१६

**वाचा -**

१) शासन अधिसूचना, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः अविवि २००९/प्र.क्र.१०५/का-४, दि.२०.१०.२०१०.

२) शासन अधिसूचना, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांकः अविवि २००९/प्र.क्र.१०५/का-४, दि.०६/१२/२०१६.

**प्रस्तावना -**

उपरोल्लेखित संदर्भ क्र.१ येथील शासन अधिसूचने अन्वये महाराष्ट्र राज्यातील वक्फांचे पुन्हा सर्व्हेक्षण करण्यासाठी सर्व्हेक्षण आयुक्त, अतिरिक्त सर्व्हेक्षण आयुक्त व सहायक सर्व्हेक्षण आयुक्तांची नियुक्ती करण्यात आलेली होती व या पुनर्सर्व्हेक्षणाची कार्यपध्दत (Modalities) तयार करण्याची कार्यवाही शासन स्तरावर सुरु होती. तथापि, राज्य मंत्रिमंडळाच्या दि.१५.११.२०१६ रोजी संपन्न झालेल्या बैठकीतील निर्णयाप्रमाणे सदर दि.२०.१०.२०१० ची शासन अधिसूचना आता वरील संदर्भ क्र.२ येथे उल्लेखित शासन अधिसूचने अन्वये रद्द करण्यात आलेली आहे. राज्य मंत्रिमंडळाच्या उपरोक्त बैठकीत प्राप्त झालेल्या मान्यतेच्या पार्श्वभुमीवर, वक्फ अधिनियम, १९९५ च्या कलम ४(६) येथील सुधारीत तरतुदींनुसार राज्यातील वक्फ मालमत्तांचे दुसरे सर्व्हेक्षण घेण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. त्याअनुषंगाने शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय -

वक्फ अधिनियम, १९९५ च्या कलम ४(६) येथील सुधारीत तरतुदींनुसार महाराष्ट्र राज्यातील वक्फ मालमत्तांचे दुसरे (Second) सर्व्हेक्षण घेण्याचा व त्याकरिता पुढे नमूद केल्याप्रमाणे सर्व्हेक्षण आयुक्त, अतिरिक्त सर्व्हेक्षण आयुक्त व सहाय्यक सर्व्हेक्षण आयुक्तांची नियुक्ती करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

(१) वक्फ अधिनियम, १९९५ च्या कलम ४(६) येथील सुधारीत तरतुदींनुसार राज्यातील वक्फ मालमत्तांचे दुसरे (Second) सर्व्हेक्षण घेण्यात यावे.

(२) वक्फ अधिनियम, १९९५ च्या कलम ४(६) येथील सुधारीत तरतुदींनुसार राज्यातील वक्फ मालमत्तांचे दुसरे (Second) सर्व्हेक्षण घेण्याकरिता जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (Settlement Commissioner and Director, Land Records) यांची "सर्व्हेक्षण आयुक्त" म्हणून, सर्व जिल्ह्यातील अतिरिक्त जिल्हाधिकारी यांची "अतिरिक्त सर्व्हेक्षण आयुक्त" म्हणून, तसेच राज्यातील प्रत्येक जिल्हयातील सर्व तालुक्यातील तहसिलदारांची त्या त्या तालुक्याकरिता "सहायक सर्व्हेक्षण आयुक्त" म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

(३) राज्यात सन १९९७ ते २००२ या कालावधीत करण्यात आलेल्या सर्व्हेक्षणामध्ये दि.१ जानेवारी, १९९६ रोजी अस्तित्वात असलेल्या राज्यातील वक्फांचे सर्व्हेक्षण करण्यात आले होते. सदरच्या दुसऱ्या (Second) सर्व्हेक्षणामध्ये दि.१ जानेवारी, १९९६ ते दि.३१ डिसेंबर, २०१५ या कालावधीत अस्तित्वात आलेल्या वक्फ संस्था व दि.३१ डिसेंबर, २०१५ रोजी अस्तित्वात असलेल्या तथापि आधीच्या सर्व्हेक्षणात समाविष्ट न झालेल्या सर्व वक्फ मालमत्तांचे सर्व्हेक्षण करण्यात यावे.

(४) सदरचे सर्व्हेक्षण सर्व संबंधित वक्फ मालमत्तांना प्रत्यक्ष भेट देऊन (Boots on ground) व सर्व संबंधित अभिलेखांची प्रत्यक्ष पाहणी करुन करण्यात यावे.

(५) आजमितीस राज्यात अस्तित्वात असलेल्या राज्यातील सर्व वक्फांच्या बाबतीत, वक्फ मालमत्ता प्रत्यक्षात कोणाच्या ताब्यात आहेत व सदरचा ताबा कायदेशीर आहे किंवा कसे तसेच, संबंधित वक्फ मालमत्ता अतिक्रमणाखाली आहेत किंवा कसे या बाबींची देखील नोंद घेण्यात यावी.

(६) यापूर्वीच अधिसूचित मिळकतींचे सर्व्हेक्षण करताना, जेथे एखाद्या सर्व्हे क्रमांकातील १००% भाग वक्फ मिळकत आहे, त्या मिळकतीच्या बाबतीत नव्याने मोजणी नकाशे तयार करण्याची आवश्यकता नाही. मात्र, अशा मिळकतीवर अतिक्रमणे आढळून आल्यास मोजणी करुन "जागेवरील परिस्थिती दर्शविणारे मोजणी नकाशे" सर्व्हेक्षण पथकाकडून तयार करण्यात यावेत. त्या नकाशांच्या आधारे अतिक्रमणे काढून टाकण्यासाठी सक्षम प्राधिकाऱ्याकडे संबंधित वक्फ संस्थेने संपर्क साधणे आवश्यक राहील. जेथे एखाद्या सर्व्हे क्रमांकातील मिळकत काही प्रमाणात वक्फ मालमत्ता व उर्वरित खाजगी/अन्य स्वरुपाची आहे तेथे प्रत्यक्ष मोजणी नकाशे तयार करुन वक्फ मालमत्तांची हद्द व क्षेत्रफळ ठरविण्याची कार्यवाही करण्यात यावी.

(७) महसूल व वन विभागाने, शासन निर्णय, म. व व. वि., क्र.वक्फ २०१५/प्र.क्र.७८/ज-१ अ, दि.१३/०४/२०१६ अन्वये असे आदेश निर्गमित केले आहेत कि, सर्व प्रकारच्या वक्फ मालमत्तांच्या {यामध्ये मशिदी, दर्गाह, कब्रस्तान, अनाथालय इ. संस्थांशी संलग्न स्थावर मालमत्ता व मशरुतुल-खिदमत इनाम जमिनींचा समावेश आहे} संदर्भात ७/१२ उताऱ्यावर फक्त संबंधित वक्फ संस्थांच्या नांवाची नोंद असावी व त्याशिवाय अन्य कोणाच्या नांवांच्या नोंदी असू नयेत. त्याचप्रमाणे, वक्फ मालमत्तांच्या भोगवटादार किंवा इतर हक्काच्या रकान्यात देखील केवळ "प्रतिबंधित सत्ता प्रकार" अशी नोंद घेण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीत मुतवल्लींचे वा इतर कोणत्याही खाजगी इसमांची नावे नोंदविण्यात येवू नयेत. अशी नांवे आधी पासून अस्तित्वात असल्यास नियमांनुसार कार्यवाहीचे अनुपालन करुन ती नांवे काढून टाकून केवळ संबंधित वक्फ संस्थेचे नांव व "प्रतिबंधित सत्ता प्रकार" अशी नोंद घेण्यात यावी.

सर्व प्रकारच्या वक्फ मालमत्तांच्या {यामध्ये मशिदी, दर्गाह, कब्रस्तान, अनाथालय इ. संस्थांशी संलग्न स्थावर मालमत्ता व मशरुतुल-खिदमत इनाम (सर्व्हिस इनाम) जमिनींचा समावेश आहे} संदर्भात ७/१२ उताऱ्यावर फक्त संबंधित वक्फ संस्थांच्या नांवाची नोंद घेण्यात आलेली आहे व त्याशिवाय अन्य कोणाच्या नांवांच्या नोंदी नाहीत, त्याचप्रमाणे, वक्फ मालमत्तांच्या भोगवटादार किंवा इतर हक्काच्या रकान्यात देखील केवळ "प्रतिबंधित सत्ता प्रकार" अशी नोंद घेण्यात आलेली आहे व कोणत्याही परिस्थितीत मुतवल्लींचे वा इतर कोणत्याही खाजगी इसमांचे नाव नोंदविण्यात आलेले नाही, या बाबी सर्व्हेक्षण आयुक्तांनी सुनिश्चित कराव्यात. अशी नांवे आधी पासून अस्तित्वात असल्यास ती काढून टाकून केवळ संबंधित वक्फ संस्थेचे नांव वा "प्रतिबंधित सत्ता प्रकार" अशी नोंद घेण्याविषयी सर्व्हेक्षण आयुक्तांनी संबंधित महसुली अधिकाऱ्यांना आदेशीत करावे. सर्व्हेक्षण आयुक्तांनी अशा प्रकरणी दिलेल्या आदेशांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित महसुली अधिकाऱ्यांची राहील.

(८) वक्फ मिळकतींची माहिती Waqf Management System of India (WAMSI) या केंद्र शासनाने विकसित केलेल्या संगणक प्रणालीत नोंदविणे आवश्यक असल्याने प्रस्तूत सर्व्हेक्षणाकरिता नमुने (Forms) विहित करण्यासाठी अल्पसंख्याक विकास विभागाच्या अधिकाऱ्यांनी जमाबंदी आयुक्तांशी तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद यांच्याशी विचारविनिमय करुन सदरचे नमुने विहित करण्यात यावेत.

(९) उपरोक्त सर्व्हेक्षण करण्यासाठी सर्व्हेक्षण आयुक्तांना (जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख महाराष्ट्र राज्य, पुणे) रु.४.२७ कोटी इतके अंदाजित मोजणी शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(१०) राज्यभरातील सर्व्हेक्षणाच्या कामाचे नियोजन करण्याच्या दृष्टीने प्रथम राज्यातील परभणी व पुणे या दोन जिल्ह्यांमध्ये पथदर्शी स्वरुपात सर्व्हेक्षण करण्यात यावे. या पथदर्शी सर्व्हेक्षणात येणाऱ्या प्रत्यक्ष अनुभव व निष्कर्षांच्या आधारे राज्यातील उर्वरीत भागातील सर्व्हेक्षणाचे काम पूर्ण करण्यात यावे.

(११) सर्व्हेक्षणाचा उपरोक्त पथदर्शी प्रकल्प राबविण्यास व त्यावरील अंदाजे रु.१.०८ कोटी इतका खर्च (मोजणी शुल्क व इतर खर्च) करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदरचा पथदर्शी प्रकल्प ६ महिन्याच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावा.

(१२) सर्व वक्फ मालमत्तांना प्रत्यक्ष भेट देऊन मोजणी/सर्व्हेक्षण करण्यासाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे पुरेसे मनुष्यबळ उपलब्ध नाही. सदर बाब विचारात घेता प्रस्तूत प्रकरणी पर्यायी व्यवस्था करणे क्रमप्राप्त आहे. सदर बाब विचारात घेता, प्रस्तूत सर्व्हेक्षणाच्या कामात सर्व्हेक्षण आयुक्तांना सहाय्य करण्याकरिता महसूल विभागाच्या अधिपत्याखाली भूमी अभिलेख विभागातून सेवानिवृत्त झालेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या कंत्राटी नियुक्तीने एक कक्ष (Cell) नेमण्यात यावा. या कक्षातील अधिकारी/कर्मचारी प्रत्यक्षात संबंधित भू-मापन कार्यालयांमध्ये वक्फ मिळकतीच्या सर्व्हेक्षणाच्या कामी कर्तव्यस्थ राहतील.

(१३) (i) वक्फ मिळकतींच्या सर्व्हेक्षणासाठी संबंधित नगर भू-मापन अधिकारी/उप अधीक्षक, भूमि अभिलेख यांच्या अधिनस्त खालीलप्रमाणे रचना असणारी पथके निर्माण करण्यात यावीत -

(१) पथक प्रमुख: भूमि अभिलेख विभागातील कार्यरत परिरक्षण भूकरमापक

(२) सेवानिवृत्त भूकरमापक/परिरक्षण भूकरमापक - २* पदे

(३) सेवानिवृत्त दुरुस्ती लिपिक - १* पद

(४) कंत्राटी तत्वावरील शिपाई - २* पदे

(टीप : *चिन्हांकित पदे महसूल विभागाने निर्माण केलेल्या कक्षामधून कंत्राटी पध्दतीने उपलब्ध करुन देण्यात यावीत.)

(ii) कामाच्या व्याप्तीनुसार महसूल विभागाने आवश्यक संख्येत पथकांची निर्मिती करावी.

(iii) सदर मोजणी पथकातील भूमि अभिलेख विभागातील कार्यरत कर्मचारी वगळता इतर सर्व कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते यावरील खर्च अल्पसंख्याक विकास विभागामार्फत करण्यात यावा.

(iv) या कामासाठी लागणारे ई.टी.एस. मशीन्स, संगणक, कार्यालयीन कामाकरिता आवश्यक असणारी स्टेशनरी, वाहतुकीची साधने व तत्संबंधीचा खर्च व इतर अनुषंगिक आकस्मिक खर्च हा अल्पसंख्याक विकास विभागामार्फत करण्यात यावा.

(v) त्या त्या जिल्ह्यातील सर्व्हेक्षणाच्या संपूर्ण कामाचे संनियंत्रण संबंधित जिल्ह्याचे जिल्हा अधीक्षक, भूमि अभिलेख हे करतील.

(vi) सदर मोजणी कामी, भूमि अभिलेख विभागाच्या भू-संपादनाकरिता विहित केलेल्या दरानुसार मोजणी फी चा अल्पसंख्याक विकास विभागाने आगावू भरणा करावा.

(१४) या सर्वेक्षणानंतर सर्व वक्फ मिळकतींचे उचित संरक्षण होईल यासाठीचा आराखडा विभागाने जास्तीत जास्त सहा महिन्यात व कोणत्याही परिस्थीतीत सर्वेक्षण पूर्ण होण्यापूर्वी तयार करावा.

(१५) सर्व्हेक्षण आयुक्तांनी संपूर्ण राज्यातील सर्व्हेक्षणाचे काम, त्यांच्या नियुक्तीविषयीच्या शासन अधिसूचनेच्या दिनांकापासून दोन वर्षाच्या कालावधीत पूर्ण करावे.

२. हे आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. वर नमूद सर्व्हेक्षणावरील खर्च भागविण्याकरिता आवश्यक अनुदान चालू आर्थिक वर्षात “मागणी क्रमांक झेडई - १ - २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण - ०२ - समाज कल्याण - १९९ - इतर अशासकीय संस्थांना सहाय - ०१ - ०१ - महाराष्ट्र राज्य वक्फ बोर्डाला सहायक अनुदान (२२३५ ए ७४१) - ३१ - सहायक अनुदान (योजनेतर)” या लेखाशीर्षातून उपलब्ध करुन देण्यात यावे.

४. हा शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौसं क्र.५३०/व्यय-४, दि.२८.९.२०१६ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२०७११२५०६३९१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shyam Arjunrao Tagade

Digitally signed by Shyam Arjunrao Tagade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ebdccd1ea7bd29723d76653e72dddcc5cf97ff4fb69ce412d0d3c6d5c23adc3e, cn=Shyam Arjunrao Tagade
Date: 2016.12.07 13:17:56 +05'30'

**( श्याम तागडे )**
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (१/२), लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (१/२), लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३. प्रधान सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव, (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. विभागीय महसूल आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद,
७. विभागीय महसूल आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर,
८. विभागीय महसूल आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती,
९. विभागीय महसूल आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक,
१०. विभागीय महसूल आयुक्त, पुणे विभाग, पुणे,
११. विभागीय महसूल आयुक्त, कोकण विभाग, बेलापूर-नवी मुंबई,
१२. सर्व जिल्हाधिकारी,
१३. सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी,
१४. सर्व तहसिलदार,
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, औरंगाबाद,
१८. संचालक, लेखा व कोषागारे (संगणक कक्ष), नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालय, मुंबई,
१९. खाजगी सचिव, मा.मंत्री (अल्पसंख्यांक विकास), मंत्रालय, मुंबई,
२०. खाजगी सचिव, मा.राज्यमंत्री (अल्पसंख्यांक विकास), मंत्रालय, मुंबई,
२१. स्वीय सहायक, मा.मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
२२. स्वीय सहायक, प्रधान सचिव (अ.वि.वि.) मंत्रालय, मुंबई,
२३. स्वीय सहायक, सह सचिव (अ.वि.वि.) मंत्रालय, मुंबई,
२४. स्वीय सहायक, उप सचिव (अ.वि.वि.) मंत्रालय, मुंबई,

२५. महसूल व वन विभाग (का-ज-१), मंत्रालय, मुंबई,
२६. वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई,
२७. सर्व अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८. सर्व कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२९. निवड नस्ती,
३०. कार्यासन-४, संग्रहार्थ.